जनवाचन आंदोलन
बालपुस्तकमाला

आवडणार नाही का तुम्हाला
पुस्तकांचं बोलणं ऐकायला?

पुस्तकांना तुम्हाला काही सांगायचंय
त्यांना तुमच्या जवळ रहायचंय
पुस्तकांमध्ये चिमण्या चिवचिवतात
पुस्तकांमध्ये हिरवी शेतं डुलतात
पुस्तकांत झऱ्यांचं पाणी गुणगुणतं
अन् पऱ्यांच्या कथा कुजबुजतात
पुस्तकांत अग्निबाणाचं रहस्य असतं
पुस्तकांत विज्ञान बोलत असतं
पुस्तकांचं जग केवढंतरी मोठं आहे
पुस्तकांमध्ये ज्ञानाची लयलूट आहे

आवडणार नाही का तुम्हाला
त्या जगात भटकायला?
पुस्तकांना तुम्हाला काही सांगायचंय
त्यांना तुमच्या जवळ रहायचंय

-सफदर हाश्मी



मूल्य रु. ६.००

भारत
ज्ञान विज्ञान
समुदाय

6 June 2003

# पोपट

लेखक रवींद्रनाथ टागोर
मराठी अनुवाद शुभांगी मोरे



भारत
ज्ञान विज्ञान
समुदाय

पुस्तकाचे नाव : पोपट
लेखक : रवींद्रनाथ टागोर
मराठी अनुवाद : शुभांगी मोरे
संपादन : विनया देशपांडे
चित्रकार : अविनाश देशपांडे
निर्मिती सहाय्य : दिनानाथ मनोहर

जवाआं ५४/ बाल-८
प्रकाशन : जून २००१

मूल्य : ६ रुपये



प्रकाशक : दत्ता देसाई
राज्य सचिव, भारत ज्ञान विज्ञान समुदाय (महाराष्ट्र)
अक्षय, २१६, केळकर रस्ता, नारायण पेठ,
पुणे-४११०३०. फोन : ०२०-४४५६६९४
मुद्रणस्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे-४११००४.

अक्षर जुळणी : गणेश कांबळे

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समितीतर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित

या प्रकाशनांचा उद्देश लोकांमध्ये आणि मुलांमध्ये वाचनाची गोडी निर्माण करणं हा आहे.

# पोपट



एक होता पक्षी. होता थोडा मूर्ख. गात असे तो छान पण वाचत नसे शास्त्र. मारीत असे उड्या आणि उडतही असे भरपूर. पण माहीत नव्हते त्यास म्हणतात कायदा कशास ?

राजा म्हणाला, 'असला पक्षी काय कामाचा? जो जंगलातली फळं खाऊन शाही फळ-बाजाराचे नुकसान करतो.'

मंत्र्याला बोलावून राजाने आज्ञा दिली 'या पक्ष्याला शिक्षण द्या!'



आणि पक्ष्याला शिकवण्याची जबाबदारी दिली गेली राजाच्या भाच्यांना.

पंडितांची सभा जमली. एकत्र बसून खूप विचार-विनिमय झाला.

समस्या खूपच अवघड होती. 'त्या पक्ष्याच्या निरक्षरतेचं कारण काय?' या गोष्टीवर खूप चर्चा झाली.

मोठ्या मोठ्या पंडितांनी चर्चेत भाग घेतला. सगळ्यांनी एकत्र आणि मोठ्या स्वरात सांगितले, ''हा पक्षी खूपच छोटसं घरटं तयार करतो. एवढ्या छोट्या घरट्यात विद्येसारख्या वजनदार गोष्टीला कसं ठेवणार? म्हणून या पक्ष्यासाठी ताबडतोब एक मोठा



छानसा पिंजरा केला जावा.''

दरबारी पंडितांचा हा सल्ला एकदम अफलातून होता! त्यांना भरभक्कम बक्षिसी दक्षिणा म्हणून मिळाली आणि सगळे आपापल्या घरी मोठ्या आनंदाने परतले.

सोनार पिंजरा तयार करून लागला. पिंजरा इतका सुंदर बनला की त्याला बघण्यासाठी देशातून, परदेशातून लोकांची रीघ लागली. सौंदर्याचे जाणकारच ते! कोणी म्हटले, ''शिक्षणाची अगदी हद्द झाली'' कोणी म्हटले, ''शिक्षण नसले म्हणून काय झाले पिंजरा तर तयार झाला! पक्ष्याच्या भाग्याचा पहा चमत्कार!''

सोनाराला थैली भरून बक्षिस मिळाले.

सगळे पंडित पक्ष्याला शिकवण्यासाठी बसले. तपकीर ओढून म्हणाले, ''एवढ्या कमी पुस्तकांनी काय होणार? पक्ष्याला शिकवणं म्हणजे सोपी गोष्ट आहे का?''



आज्ञाधारी भाचे तर आज्ञेची वाटच बघत होते. त्यांनी लगेच पुस्तकं लिहिणाऱ्यांना बोलवलं. तेही कमी आज्ञाधारी नव्हते. लगेच पुस्तकांची नक्कल करणं चालू झाले. नकलेची परत नक्कल सुरू झाली. अशी खूप पुस्तकं लिहिली गेली. बघता बघता पुस्तकांचा डोंगर तयार झाला. जो बघेल तो गळा फाडून प्रशंसा करू लागला. ''शाब्बास, शाब्बास, विद्या ठेवायला जागाच कुठे आहे ?''

नक्कल करणाऱ्यांना पारितोषिकं मिळाली, तीही



बैलगाडी भरून. बैल घराच्या दिशेने तोंड वळवून पळू लागले, कोणाच्याही घरी काहीही कमी पडले नाही.

मौल्यवान पिंजऱ्याच्या देखभालीची चिंता भाच्यांना सतावत होती. एकीकडे चिंता आणि दुसरीकडे व्यग्रता. त्यांना खूप काम होते. सफाईचे काम, दुरूस्तीचे काम. फक्त काम, काम आणि काम! अगदी डोकं लढवून आणि उत्तम प्रकाराने हे काम होत होतं. पिंजऱ्याची साफसफाई आणि चमचमणारं त्याचं पॉलीश बघून लोक म्हणू लागले, 'प्रगती होत आहे.'





मोठं काम संपन्न व्हायचं तर खूप माणस हवीच! त्यामुळे त्या मोठ्या कामासाठी दिवसेंदिवस माणसांची संख्या वाढायला लागली. मग त्या माणसांच्या कामाची देखभाल करायला अजून माणसं ठेवली. ते गलेलठ्ठ पगार घेऊन भारी-भारी रजिस्टर भरू लागले, भरतच गेले.

या सगळ्या लोकांचे मामेभाऊ, चुलत भाऊ, मावसभाऊ राजवाड्यात आणि वाड्यांमध्ये गाद्या घालून आराम करू लागले.



जगात अनेक गोष्टींची कमतरता आहे, परंतु निंदकांची काही कमतरता नाही. गरजेपेक्षा निंदक जास्तच आहेत. ते म्हणाले, ''पिंजऱ्याची प्रगती तर होत आहे, पण पक्ष्याची देखभाल करायला कोण आहे?''

राजाच्या कानी ही गोष्ट पडली. राजाने सगळ्यात जबाबदार भाच्याला बोलावले आणि तो म्हणाला, ''अरे बाळा, मी हे काय ऐकतो आहे ?''





तेव्हा भाच्याने सहजपणे उत्तर दिले, ''महाराज तुम्हाला तर देवाप्रमाणे सगळं काही माहीत आहेच. तरीही तुम्हाला खरी माहिती हवी असेल तर सगळ्यांना बोलवा. सोनार, पंडित, नक्कल करणारे, दुरूस्ती करणारे, पहारा देणारे, सगळ्या- सगळ्यांना बोलवा. निंदा करणाऱ्यांना काय काम आहे ? त्यांना खायला मिळत नाही म्हणून ते निंदा करतात.''

उत्तर ऐकून राजाने सर्व परिस्थितीचा आढावा घेतला. आणि खूष होऊन त्याने भाच्याला एक सोन्याचा हार बक्षीस दिला.

एकदा राजाला वाटले शिक्षणाची तयारी किती



जोरात चालली आहे हे स्वतःच्या डोळ्याने बघावे. म्हणून एक दिवस तो आपले विश्वासू मंत्री, दिवाण आणि मित्र यांच्याबरोबर विद्याशाळेत गेला.

राजाचे आगमन होताच दारापाशी ढोल, ताशा, शंख, मृदुंग, नगारे, तुताऱ्या असे सारे वाजायला सुरूवात झाली. सर्व पंडित जोरजोरात शेंडी हलवून हलवून मंत्र म्हणू लागले. मिस्त्री, मजूर, सोनार, पुस्तक लिहिणारे, पहारेकरी आणि त्या सगळयांबरोबर मामेभाऊ, चुलतभाऊ आणि मावसभाऊ यांनी एका सुरात जयजयकार केला.





मोठा भाचा म्हणाला, ''बघा महाराज सगळी तयारी तुमच्या समोर आहे. तुमच्यापासून काहीच लपून रहात नाही. तुम्ही तर पर्वतामागचेही रहस्य जाणू शकता.''

महाराज खूप खूष होऊन परतले. दरवाजातून बाहेर पडून ते हत्तीवर बसणार तेवढ्यात गर्दीच्या आड थांबलेला एक निंदक म्हणाला, ''महाराज तुम्ही पक्ष्याला बघितलं की नाही ?''

पहिल्यांदा महाराज आश्चर्यचकीत झाले आणि मग स्वतःशीच बोलले, ''अरे मी तर विसरलोच,



पक्ष्याला बघायचे तर राहूनच गेले.''

परत येऊन पुन्हा पंडितांना त्यांनी विचारले. ''पक्ष्याला तुम्ही कसं शिकवता, काय शिकवता ? पक्ष्याला बघण्याची माझी इच्छा आहे.''

राजाच्या इच्छेप्रमाणे त्यांना सगळं दाखविण्यात आलं. ते बेहद्द खूष झाले. पण पक्ष्याला शिकवण्यासाठी केलेली तयारीच इतकी होती की त्यात स्वतः पक्षी कुठेच दिसत नव्हता. राजालाही वाटलं आता पक्ष्याला बघण्याची काय गरज आहे? राजा बुद्धिमान होता. त्याने लगेच ओळखलं की या तयारीमध्ये काहीही कमतरता नाही.





पिंजऱ्यामध्ये ना दाणे होते, ना पाणी होते. होता फक्त विद्येचा भडीमार. खूप साऱ्या पुस्तकांची पाने फाडून पेनाच्या टोकाने पक्ष्याच्या तोंडात कोंबली जात होती. गाणं तर बंदच होतं. ओरडण्याचीही सोय नव्हती. ते बघूनच अंगावर शहारे उभे रहात होते.

यावेळी राजाने हत्तीवर चढताना मात्र 'कान-पिरगळणाऱ्या' सरदाराला आज्ञा केली की, ''मगाच्या त्या निंदकाचे दोन्ही कान जोरात खेचा.''

दिवसेंदिवस, शिकलेल्या लोकांच्या वागण्यामुळे



पक्ष्याची अवस्था अर्धमेली झाली होती. लोकांना एकूण प्रगती आशादायी वाटत होती. पण पक्षीच तो! आपल्या स्वभावाप्रमाणे तो पूर्व दिशेच्या प्रकाशाकडे एकटक बघे व जंगलातल्या पक्ष्याप्रमाणे आपले पंख फडफडवी. एवढंच नाही तर तो कधी कधी त्याचा मौल्यवान पिंजराच तोडण्याचा प्रयत्न करीत असे.

ते बघून कोतवाल चिडला आणि जोरात ओरडला ''हा काय गाढवपणा ?''

मग विद्याशाळेत, म्हणजेच पक्ष्याच्या शाळेत छन्नी व हातोडी घेऊन लोहार हजर झाला. ठकठक, ढणढण असं संगीत सुरू झालं. आणि बघता बघता लोखंडाची एक साखळी तयार झाली.





पक्ष्याच्या पायात साखळी अडकवली गेली आणि पाहता पाहता पक्ष्याचे पंखही छाटण्यात आले.

राजाचे खूशमस्करे तोंड फुगवून आणि डोकं हलवून म्हणाले, ''या राज्यातल्या पक्ष्यांचं काही विचारूच नका. त्यांना अक्कल तर कधी नव्हतीच. आता त्यांच्यात कृतज्ञताही राहिली नाही.''

लोहाराची आमदनी दिवसेंदिवस वाढत गेली आणि लोहाराच्या बायकोच्या अंगावर सोन्याचे बरेच दागिने दिसू लागले. कोतवालाची हुषारी बघून राजाने त्याला सुद्धा मोठे बक्षीस दिले.



एके दिवशी पक्षी मेला! केव्हा मेला याची निश्चित तारीख कोणत्याही इतिहासकाराला माहीत नाही. दळभद्री निंदकांनी प्रचार सुरू केला, 'पक्षी मेला बरं का!'

राजाने सर्वात मोठ्या भाच्याला बोलावले आणि विचारले की, ''बेटा, मी हे काय ऐकतो आहे ?''

भाच्याने हात जोडून नम्रपणे राजाला सांगितले, ''महाराज पक्ष्याचे शिक्षण पूर्ण झाले.''

राजाने विचारले, ''अजून तो उड्या मारतो का ?''

भाच्याने थोडेसे खाकरून सांगितले ''आता रामाचे नाव घ्या !''



"उडतो का ?"

"नाही !"

"गातो का ?"

"नाही !"

राजा म्हणाला "एकदा पक्ष्याला आणून दाखवा !"



पक्षी आला. त्याच्याबरोबर कोतवाल, सैनिक आणि घोडेस्वार सुद्धा होते.



राजाने पक्ष्याला बोटांनी दाबलं. पक्ष्याने हूं की चूं ही केले नाही. ना श्वास चालू होता, ना पंखविहीन देह काही हालचाल करत होता. फक्त त्याच्या पोटातून पुस्तकांच्या सुकलेल्या पानांची खरखर तेवढी ऐकू आली.

बाहेर वसंत ऋतूत नवीनच फुललेल्या कळ्यांनी आणि फुलांनी मात्र एक दीर्घ उसासा सोडला.

---ooo---